**अमृत संस्थेव्दारे राबविण्यात येणा-या योजनांच्या अमंलबजावणीसाठी तसेच, अमृत संस्थेच्या कार्यालयीन खरेदीसाठी खरेदी समिती गठीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अमृत २०२३/प्र.क्र. २२ /संस्था (अमृत)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २८/०३/२०२३

**संदर्भ** :- १. शासन ज्ञापन, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, दि. २२/८/२०१९

२. उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/ उद्योग-४, दि. १ डिसेंबर, २०१६

३. व्यवस्थापकीय संचालक, अमृत यांचे दिनांक २१.३.२०२३ चे पत्र

**प्रस्तावना:-**

बार्टी या संस्थेच्या धर्तीवर खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील विद्यार्थी, युवक-युवती व इतर इमेदवारांकरीता विविध उपक्रम, कार्यक्रम इ. राबविण्यात येऊन तसेच इतर माध्यमांतूनही त्यांचा विकास घडविण्यासाठी महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी Academy of Maharashtra Research, Upliftment and Training (AMRUT) (अमृत) संस्था स्थापन करण्यात आली असून सदर संस्थेची नोदंणी रजिस्ट्रेशन ॲक्ट (Society Registration Act १८६०) आणि सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० (सन १९५० चा मुंबई अधिनियम क्रमांक २९) अंतर्गत करण्यात आली आहे.

अमृत संस्थेच्या दि. १३/३/२०२३ रोजी झालेल्या बोर्ड ऑफ गर्व्हर्नन्सच्या बैठकीमध्ये एकुण १३ योजनांना मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच येणा-या काळात आणखी काही योजनांचा समावेश होणार असल्याने त्या सर्व योजनांची अमंलबजावणी करण्यासाठी येत्या काळात निविदा प्रकिया राबवावी लागणार आहे. तसेच अमृत संस्थेच्या नियमित कार्यालयीन कामकाजाकरीता काही बाबींची खरेदी करावी लागणार आहे. अमृत संस्थेच्या कार्यालयीन कामकाजाकरीता तसेच संस्थेव्दारा राबविण्यात येणाऱ्या योजनाच्या अंमलबजावणीसाठी खरेदीसाठी उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या दि. १/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २.९.४ नुसार खरेदी समिती स्थापन करण्यास, तसेच सदर खरेदी समितीस रु. १०.०० कोटी पर्यंतच्या निविदांना मान्यता देण्याचे अधिकार देण्याची विनंती व्यवस्थापकीय संचालक, अमृत यांनी केली आहे. त्यानुसार अमृत या संस्थेअंतगत खरेदी समिती स्थापन करण्यास तसेच त्यांना वित्तीय मर्यादा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

अमृत संस्थेअंतर्गत योजनांची अमंलबजावणी करण्यासाठी येत्या काळात निविदा प्रकिया राबवावी लागणार आहे. तसेच अमृत संस्थेच्या नियमित कार्यालयीन कामकाजाकरीता काही बाबींची खरेदी करावी लागणार असल्याने उद्योग उर्जा

व कामगार विभागाच्या दि. १/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २.९.४ नुसार खालील प्रमाणे खरेदी समिती गठीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे:-

| **अ.क्र.** | **समितीवरील सदस्य** | **पद** |
|---|---|---|
| १. | व्यवस्थापकीय संचालक, अमृत पुणे | अध्यक्ष |
| २. | उप सचिव, संस्था/अर्थसंकल्प, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ | सदस्य |
| ३. | सहसंचालक, लेखा व कोषागारे, पुणे विभाग, पुणे येथील गट अ अधिकारी | सदस्य |
| ४. | उद्योग सहसंचालक, पुणे यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५. | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | सदस्य सचिव |

उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या दि. १/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयात नमूद केलेल्या खरेदी नियम पुस्तिकेतील नियमानुसार अमृत संस्थेअंतर्गत उक्त खरेदी समितीस रुपये ५.०० कोटीपर्यंतची खरेदी प्रक्रिया राबविण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहे. तसेच अन्य तज्ञ व्यक्तींना निमंत्रित करण्याचे अधिकार अध्यक्षांना असतील.

२. तसेच अमृत संस्थेच्या कार्यालयीन कामकाजाकरीता तसेच संस्थेव्दारा राबविण्यात येणाऱ्या योजनाच्या अंमलबजावणीसाठी रुपये ५.०० कोटीपेक्षा अधिक खरेदीसंदर्भात खालील उच्चाधिकार समितीची मान्यता घेऊन खरेदी करणे आवश्यक राहील.

| अ.क्र. | उच्चाधिकार समिती | |
|---|---|---|
| १ | विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव | अध्यक्ष |
| २ | विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव (वित्त विभाग) | सदस्य |
| ३ | विकास आयुक्त (उदयोग) | सदस्य |

तसेच अन्य तज्ञ व्यक्तींना निमंत्रित करण्याचे अधिकार अध्यक्षांना असतील.

उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या दि. १/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील, तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या खरेदी विषयक कार्यपध्दती नुसार खरेदी प्रकिया पूर्ण करणे आवश्यक राहील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२९१५३००३११३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c550dd52f3943153bdbd47e381bb9818c91359bd0588e1b35b3c0c18ad7bf938,
pseudonym=B6DDBEDBC1E63E4332429DB625320D8F56899C89,
serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2023.03.29 15:34:43 +05'30'

**( कैलास साळुंके )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अ.मु.स, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्विय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.

३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र संशोधन उन्नती व प्रशिक्षण प्रबोधिनी (अमृत)), पुणे.
४. विकास आयुक्त (उदयोग) उदयोग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई ३२
५. उद्योग सहसंचालक, पुणे
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी पुणे.
१०. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प)/रोखशाखा, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (अमृत).